**मा.मुख्यमंत्री/ मंत्री/ राज्यमंत्री यांचे कार्यालयात नियुक्ती देण्यात आलेल्या/ येणा-या बाहेरील उमेदवारांना महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ लागू करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमआयएन १२१५//प्र.क्र.७६/२१,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २९ एप्रिल, २०१५.

__वाचा__ : १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:एमआयएन १२१४/प्र.क्र.२८८/२१, दि.१४.११.२०१४
२) केंद्र शासनाच्या Ministry of Personnel, Public Grievances And Pensions विभागाचे Office Memorandum क्र.८/१/९७-सी.एस.दोन, दिनांक २० जानेवारी,१९९७

__**प्रस्तावना:**__ संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतुदीनुसार मा.मुख्यमंत्री/ मंत्री/ राज्यमंत्री यांचे शिफारशीनुसार त्यांचे कार्यालयात बाहेरील उमेदवार नेमण्याची तरतूद विहीत केली आहे. सदर बाहेरील उमेदवारांची नियुक्ती ही मंत्रीमंडळाच्या कालावधीपर्यंत अथवा मा.मंत्री महोदयांना त्यांचे सेवेची आवश्यकता आहे तोपर्यंत असते. केंद्र शासनाच्या मा.मंत्री/उपमंत्री/संसदीय सचिव यांचे कार्यालयातील बाहेरील उमेदवारांना Central Civil Service (Conduct) Rules संदर्भाधीन क्रमांक २ च्या Office Memorandum अन्वये लागू करण्यात आले आहेत. केंद्र शासनाच्या धर्तीवर मा.मुख्यमंत्री/ मंत्री/ राज्यमंत्री यांचे कार्यालयात नियुक्त करण्यात आलेल्या बाहेरील उमेदवारांना महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :** मा.मुख्यमंत्री/ मंत्री/ राज्यमंत्री यांचे कार्यालयात विशेष कार्य अधिकारी, स्वीय सहायक, वाहनचालक व शिपाई म्हणून नियुक्ती देण्यात आलेल्या/येणा-या बाहेरील उमेदवारांना महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ लागू करण्यात येत आहे.तसेच नियुक्ती दिलेल्या बाहेरील उमेदवारांनी त्यांचे मत्ता व दायित्वाचे मार्च अखेरचे विवरणपत्रे दर वर्षी सादर करणे त्यांचेवर बंधनकारक राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४३०१६०११३४३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

Deepak Vithal Naik
Digitally signed by Deepak Vithal Naik
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=c17a9eb76dccc0adfef491fb87977dff77eda50b4d2a4adca91a2f296f9c88de, cn=Deepak Vithal Naik
Date: 2015.04.30 16:07:54 +05'30'

**( दि. वि. नाईक )**
अवर सचिव,सामान्य प्रशासन विभाग

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन,मुंबई
२) प्रधान सचिव/सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
३) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,मंत्रालय,मुंबई
४) महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर
५) उप सचिव (प्रशासन), मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
६) खाजगी सचिव, सर्व मंत्री / राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई
७) सामान्य प्रशासन विभाग/का.१२,मंत्रालय,मुंबई
८) निवड नस्ती.